जिल्हा व सत्र न्यायालय, सिंधुदूर्ग यांच्या आस्थापनेवरील अस्थायी पदे पुढे चालू ठेवण्यास मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : अस्थायी ०३२५/८१/प्र.क्र.५३/कार्यासन ११**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १२ मार्च, २०२५

**पहा**: १. शासन निर्णय, वित्त विभाग क्र.असंक १००१/प्र.क्र.२९/२००१, वित्तीय सुधारणा,दि.१०/९/२००१.
२. शासन निर्णय, विधि व न्याय विभाग, क्र. अस्थायी ०२२४/प्र.क्र.६४/कार्यासन ११, दि.२०/०९/२०२४
३. शासन निर्णय, वित्त विभाग क्र.पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क.,दि.०३/०३/२०२५
४.जिल्हा व सत्र न्यायालय, सिंधुदूर्ग यांचे पत्र क्र.प्रशा/१५६सन २०२५, दि.०६/०१/२०२५

**प्रस्तावना :**

जिल्हा व सत्र न्यायालय, सिंधुदुर्ग यांच्या आस्थापनेवरील ५८ अस्थायी पदांना संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये दि.०१/०९/२०२४ ते दि.२८/०२/२०२५ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती. संदर्भ क्र. ३ येथील शासन निर्णयान्वये सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच यापूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतू, ज्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही, अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दि. ०१/०३/२०२५ ते दि. ३१/०८/२०२५ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार प्रदान करण्यात आले आहेत. त्यानुसार जिल्हा व सत्र न्यायालय, सिंधुदुर्ग यांच्या आस्थापनेवरील ५८ अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

जिल्हा व सत्र न्यायालय, सिंधुदूर्ग यांनी संदर्भ क्र.४ च्या पत्रान्वये विनंती केल्यानुसार त्यांच्या आस्थापनेवरील पुढील तक्यात नमूद केलेली ५८ अस्थायी पदे दि.०१/०३/२०२५ ते दि.३१/०८/२०२५ या कालावधीत पुढे चालू ठेवण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदनाम | अस्थायी पदांची संख्या |
|---|---|---|
| १ | अधिक्षक | १ |
| २ | सहायक अधिक्षक | ४ |
| ३ | वरिष्ठ लिपिक | ७ |
| ४ | कनिष्ठ लिपिक | २३ |
| ५ | मराठी लघुलेखक (निम्न श्रेणी) | १ |
| ६ | मराठी व इंग्रजी लघुलेखक (निम्न श्रेणी) | १ |
| ७ | लघुलेखक (ग्रेड-३) | १ |

| | | |
|---|---|---|
| ८ | प्रमुख बेलिफ | २ |
| ९ | बेलिफ | ७ |
| १० | पहारेकरी | २ |
| ११ | चपराशी | ८ |
| १२ | सफाई कामगार | १ |
| **एकूण** | | **५८** |

४. यासाठी होणारा खर्च" मागणी क्र.जे-१, २०१४, न्यायदान, १०५ -दिवाणी व सत्र न्यायालये, (०२) जिल्हा व सत्र न्यायाधीश, (०२) (०१) जिल्हा व सत्र न्यायाधीश (दत्तमत) (अनिवार्य) (२०१४ ०१७२)" या लेखाशीर्षांतर्गत ०१, वेतन खाली सन २०२५-२०२६या वित्तीय वर्षातील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय, वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क, दि.०३/०३/२०२५ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३१२१४५७१३३८१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

HEMANGI AJIT SHETYE

Digitally signed by HEMANGI AJIT SHETYE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, 2.5.4.20=a80fef4908844f3f0e391754221ba7b421d28c866533441 50a5e31030c791f4b, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7328C41D6A5210C49CCE931861626D508AE4537 D7BB43F92AC6D5796595AADB8, cn=HEMANGI AJIT SHETYE
Date: 2025.03.12 14:58:12 +05'30'

**( हेमांगी शेट्ये )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. प्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई,
२. प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, जिल्हा व सत्र न्यायालय, सिंधुदूर्ग,
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई,
४. महालेखापाल (लेखापरीक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई,
५. जिल्हा कोषागार अधिकारी, सिंधुदूर्ग,
६. विधि व न्याय विभाग, कार्या-२०/२३, मंत्रालय, मुंबई,
७. वित्त विभाग, व्यय- ५/ आ.पु.कक्ष / अर्थसंकल्प ११, मंत्रालय, मुंबई,
८. निवडनस्ती (कार्यासन ११).